**शिवछत्रपती क्रीडापीठ, पुणे व राज्यातील ११ क्रीडा प्रबोधिनींचे व्यवस्थापन व संचालनासाठी स्थापन करण्यात आलेल्या उच्चस्तर धोरण समितीमध्ये अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१२४/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ जानेवारी, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.क्रीडायो-३४१२/प्र.क्र.१४/क्रीयुसे-१, दिनांक २४ मे, २०१३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.विपच-३८१४/प्र.क्र.१४८/क्रीयुसे-१, दिनांक १० जून, २०१४.

**प्रस्तावना :-**

शिवछत्रपती क्रीडापीठ, पुणे व ११ क्रीडा प्रबोधिनी यांच्या कामकाजावर नियंत्रण ठेवण्यासाठी उच्चस्तर धोरण समिती, कार्यकारी समिती तसेच देखभाल व व्यवस्थापन समिती स्थापन करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदरहू तीन समित्यांपैकी उच्चस्तर धोरण समितीमध्ये (अ) अर्जून पुरस्कार प्राप्त खेळाडू - २ सदस्य, (ब) शिवछत्रपती पुरस्कार प्राप्त खेळाडू - २ सदस्य, (क) क्रीडा प्रबोधिनींचे प्राचार्य - २ सदस्य अशा सदस्यांची नियुक्ती मा.मंत्री (क्रीडा) यांच्या स्तरावरुन करावयाची असून या सदस्यांचा कालावधी २ वर्षांकरिता असणार आहे. त्यानुसार या संदर्भात दिनांक १०.०६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये नियुक्त करण्यात आलेल्या सदस्यांचा कालावधी संपल्याने राज्यातील प्रथितयश, नामांकित अर्जून पुरस्कार व शिवछत्रपती पुरस्कार प्राप्त प्रत्येकी दोन खेळाडूंची नियुक्ती उच्चस्तर धोरण समितीमध्ये करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय:-

उपरोक्त पार्श्वभूमीवर या संदर्भात खालीलप्रमाणे सदस्यांच्या नियुक्तीस मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) अर्जून पुरस्कार प्राप्त खेळाडू | - | अ) श्री.शांताराम जावध, कबड्डी |
| | | ब) श्रीमती अपर्णा पोपट, बॅडमिंटन |
| २) शिवछत्रपती पुरस्कार प्राप्त खेळाडू | - | अ) श्रीमती सुरेखा सिरसाठ, |
| | | ब) श्री.तपन पाणीग्रही, |

३) क्रीडा प्रबोधिनीचे प्राचार्य - अ) क्रीडा प्रबोधिनी, पुणे
ब) क्रीडा प्रबोधिनी, अकोला

२. उपरोक्त सदस्यांचा कालावधी शासन निर्णयाच्या दिनांकापासून दोन वर्षाचा राहील. अनुक्रमांक १ व २ येथील अशासकीय सदस्यांना उपरोक्त उच्चस्तर समितीच्या बैठकीकरिता उपस्थित राहण्यासाठी बैठकभत्ता व दैनंदिन भत्ता वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय राहील. तसेच या बाबीवर होणारा खर्च शिवछत्रपती क्रीडापीठाच्या पुणे यांच्याकडील सुविधा आरक्षणाच्या उत्पन्नातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१५४६३७१६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=862038e0fbcf90998980c1f9241c4bdd9f61a60c9a06a5fe43c17f10b41e85f5, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2017.01.25 15:43:34 +05'30'

(कि. ल. संखे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव, सांस्कृतिक व पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. उपरोक्त समितीमधील सर्व संबंधित अशासकीय सदस्य (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर.
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१२. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१३. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१४. वित्त विभाग (व्यय-५), नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-३२.
१५. मा.मंत्री (क्रीडा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. ग्रंथपाल, विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१७. निवडनस्ती (क्रीयुसे-१).